**दुसऱ्या महायुध्दात भाग घेतलेल्या माजी सैनिकांना/त्यांच्या विधवांना दरमहा देण्यात येणाऱ्या प्रत्येकी रु. ३०००/- इतक्या अर्थसहाय्यात वाढ करुन ते दरमहा रु. ६०००/- करण्यास मंजुरी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१५/मुमंस-१५/(प्र.क्र.१२८/१५)/२८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १८.०९.२०१८.

<u>वाचा</u>

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.रासैम-१०८९/प्र.क्र.५४/८९/२८, दिनांक २९.१२.१९८९.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.रासैम-१०९१/प्र.क्र.३१२/९२/२८, दिनांक ११.०६.१९९३.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम-१०९५/३१९६/प्र.क्र.१९१/९५/२८, दिनांक ३०.०३.१९९९.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम-२००४/प्र.क्र.१२०/२००४/२८, दिनांक ३०.०३.२००५.
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण-२००८/प्र.क्र.२८/०९/२८, दिनांक १३.०५.२०११.
६) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६३६०/दूमयु अनुदान वाढ/सैकवि-१६, १५९१, दिनांक १५ जून. २०१७.

**<u>प्रस्तावना</u> :**

दुसऱ्या महायुध्दात भाग घेतलेल्या व माहे डिसेंबर, १९४९ पर्यंत वा तद्नंतर पदमुक्त झालेल्या राज्यातील माजी सैनिकांना/त्यांच्या विधवांना संदर्भाधिन दिनांक २९.१२.१९८९ च्या शासन निर्णयान्वये दरमहा रु. ३००/- प्रमाणे मासिक निवृत्तीवेतन दिनांक १ ऑक्टोबर, १९८९ पासून देण्यास मंजूरी देण्यात आली. सदर निवृत्तीवेतन/अर्थसहाय्यात वेळोवेळी वाढ करण्यात आली असून सध्या संदर्भाधिन दिनांक १३.०५.२०११ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०५.२०११ पासून दरमहा रु.३०००/- (रुपये तीन हजार फक्त) इतके अर्थसहाय्य देण्यात येत आहे. या योजनेच्या प्रत्येक लाभार्थ्यास सध्या देण्यात येणाऱ्या दरमहा रु. ३०००/- इतक्या अर्थसहाय्य रकमेची क्रयशक्ती दिवसेंदिवस वाढत असलेल्या महागाईमुळे फारच कमी झाली असून, सदर रक्कम लाभार्थ्यांच्या उदर

निर्वाहाच्यादृष्टीने अत्यंत कमी असल्यामुळे या अर्थसहाय्याच्या रकमेत वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

दुसऱ्या महायुध्दात भाग घेतलेल्या राज्यातील माजी सैनिकांना/त्यांच्या विधवांना संदर्भाधिन दिनांक १३.०५.२०११ च्या शासन निर्णयान्वये देण्यात येणाऱ्या दरमहा रु. ३०००/- इतक्या अर्थसहाय्यात रु. ३०००/- ने वाढ करुन ते दिनांक १ एप्रिल, २०१८ पासून दरमहा रु. ६०००/- (रुपये सहा हजार फक्त) इतके अर्थसहाय्य करण्यास शासन मान्यता देत आहे. त्यासाठी येणारा खर्च "मागणी क्र. ए-५, लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०- इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम १०२- सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने (००)(०२) महाराष्ट्रात अधिवासी असलेल्या, दुसऱ्या जागतिक महायुध्दातील माजी सैनिक/त्यांच्या विधवा यांना निवृत्तीवेतन (२२३५ १८३५) - ०४, निवृत्तीवेतनविषयक खर्च" या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. या अर्थसहाय्याच्या रकमेचे प्रदान लाभार्थीचे खाते असलेल्या बँकेमार्फत करण्यात यावे. तसेच सुधारित दराने अर्थसहाय्य अदा करतांना लाभार्थी हयात असल्याची जिल्हाधिकाऱ्यांनी वेळोवेळी संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांच्या मदतीने पडताळणी व खातरजमा करावी.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३२/२०१८ व्यय- ४, दिनांक १८/६/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१८१६४५०५१३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Mahadeo Jakate

Digitally signed by Kishor Mahadeo Jakate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b70645b34ddd8d92842418782eb54a6897ffe96f4da14db285f027cafa55d1, serialNumber=032a6acbfd529d66dd76e26eab14b28c6dd07d2f776e529b44ba2cb45324c503, cn=Kishor Mahadeo Jakate
Date: 2018.09.18 16:49:29 +05'30'

**(कि. म. जकाते)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

४. मुख्य सचिव,

५. सर्व विभागीय आयुक्त,

६. सर्व जिल्हाधिकारी,

७. सर्व मंत्रालयीन विभाग,

८. सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई

९. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

११. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२

१२. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,

१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

१६. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),

१७. सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,

१८. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,

१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,

२०. वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१४),

२१. सामान्य प्रशासन विभाग/का.२५,

२२. निवड नस्ती (२ प्रती).